राष्ट्रीय परीक्षा एजन्सी (NTA) यांचेमार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या परीक्षांच्या अनुषंगाने "राज्यस्तरीय समन्वय समिती" व "जिल्हास्तरीय समन्वय समिती" गठीत करण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.परीक्षा-२०२५/प्र.क्र.१२ (भाग-१)/तांशि-४**
मंत्रालय विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२५.

<u>संदर्भ</u>:- १) राष्ट्रीय परीक्षा एजन्सी यांचे पत्र क्र.NTA/९२१३/JEE (Main)-२०२५, दि.०३.१२.२०२४
२) राष्ट्रीय परीक्षा एजन्सी यांचे पत्र क्र.NTA/९२१३/JEE (Main)-२०२५, दि.२०.१२.२०२४
३) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.२/एनजीसी/NTA Exam/२०२५/३१, दि.१४.०१.२०२५
४) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.२/एनजीसी/NTA Exam/२०२५/६१, दि.२३.०१.२०२५
५) राष्ट्रीय परीक्षा एजन्सी यांचे पत्र क्र.NTA/NEET-UG/२०२५, दि.०४.०२.२०२५
६) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.२/एनजीसी/NTA Exam/२०२५/९९, दि.१०.०२.२०२५

**<u>प्रस्तावना :-</u>**

उच्च शिक्षण विभाग, शिक्षण मंत्रालय, भारत सरकार यांच्या अंतर्गत असलेल्या राष्ट्रीय परीक्षा एजन्सी (NTA), नवी दिल्ली या स्वायत्त संस्थेमार्फत JEE Main, NEET, UGC-NET, CUET इ. विविध परीक्षा देशभरात आयोजित करण्यात येतात. राज्यात सदर परीक्षा पारदर्शक, सुरळीत व निर्विघ्नपणे पार पाडण्याच्या अनुषंगाने राज्य स्तरावर व जिल्हा स्तरावर समन्वय राखण्यासंदर्भात राष्ट्रीय परीक्षा एजन्सी (NTA) यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्रांन्वये निर्देशित केल्यानुसार, **"राज्यस्तरीय समन्वय समिती"** व **"जिल्हास्तरीय समन्वय समिती"** गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने यासंदर्भात खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय परीक्षा एजन्सी (NTA), नवी दिल्ली यांचे मार्फत राज्यात घेण्यात येणाऱ्या JEE Main, NEET, UGC-NET, CUET इ. विविध परिक्षा पारदर्शक, सुरळीत व निर्विघ्नपणे पार पाडण्याकरीता राज्य स्तरावर व जिल्हा स्तरावर समन्वय राखण्यासाठी खालीलप्रमाणे "**राज्यस्तरीय समन्वय समिती**" गठीत करण्यात येत आहे:-

| क्र. | समितीची रचना | राज्यस्तरीय समन्वय समितीचे सदस्य |
|---|---|---|
| a) | Nodal Officer (Civil) nominated by Chief Secretary (Chairperson) | आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई. |
| b) | Representative of State Police | अपर पोलीस आयुक्त, पूर्व प्रादेशिक विभाग, बृहन्मुंबई. |
| c) | Nodal Officer nominated by DG, NTA | राष्ट्रीय परिक्षा एजन्सी (NTA) यांनी नियुक्ती केलेला अधिकारी. |
| d) | State-level NIC officer | राज्यस्तरीय एनआयसी (NIC) अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई |

| | | |
|---|---|---|
| e) | Subsidiary Intelligence Bureau (SIB) Officer | Subsidiary Intelligence Bureau (SIB) यांनी नियुक्त केलेला राज्यस्तरीय अधिकारी. |
| f) | Any other member Co-opted by the Committee | राज्यस्तरीय समन्वय समितीमार्फत नियुक्त सदस्य. |

राष्ट्रीय परिक्षा एजन्सी (NTA) यांचे मार्फत आयोजित JEE Main, NEET, UGC-NET, CUET इ. परिक्षा व्यवस्थित पार पाडण्याच्या अनुषंगाने उपरोक्त समितीस NTA ने नेमून दिलेली कार्ये व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे आहेत :-

१) मुख्य सचिव, DGP आणि DG-NTA यांच्यात हॉटलाईन स्थापित करणे.
२) एकात्मिक व्यूहरचना तयार करून पेपर फुटी थांबविणे.
३) प्रमुख परीक्षांसाठी जसे की, JEE Main, NEET, UGC-NET, CUET इ. परीक्षांसाठी विशिष्ट व्यूहरचना तयार करून निष्पक्षरित्या परीक्षा प्रणालीमध्ये कोणतीही त्रुटी राहणार नाही, याची दक्षता घेणे.
४) जिल्हास्तरीय समितीचे सदस्य नियुक्त झाल्याचे व समिती कार्यान्वित झाल्याची खात्री करणे.
५) प्रत्येक मुख्य परीक्षा झाल्यानंतर जिल्हास्तरीय समितीच्या कार्याचा आढावा घेणे.
६) जिल्हास्तरीय समितीचे निष्कर्ष विचारात घेऊन, आपल्या शिफारशींसह एकत्रित अहवाल पुढील कार्यवाहीसाठी राष्ट्रीय परिक्षा एजन्सी (NTA) ला सादर करणे.
७) राष्ट्रीय परिक्षा एजन्सीव्दारे वेळोवेळी देण्यात येणाऱ्या सूचनांनुसार कार्यवाही करणे.

२. तसेच, जिल्हास्तरावरील JEE Main, NEET, UGC-NET, CUET इ. परिक्षेच्या नियोजनासंदर्भात राज्यस्तरीय समन्वय समितीशी समन्वय साधण्याकरीता जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे **"जिल्हास्तरीय समन्वय समिती"** गठीत करण्यात येत आहे.

| क्र. | समितीची रचना | जिल्हास्तरीय समन्वय समितीचे सदस्य |
|---|---|---|
| a) | District Magistrate (Chairperson) | संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी |
| b) | Head of the Police force in the District | जिल्हा पोलीस अधीक्षक. |
| c) | District Nodal officer (NTA) | राष्ट्रीय परिक्षा एजन्सी (NTA) यांनी नियुक्त केलेला जिल्हास्तरीय अधिकारी. |
| d) | District Educational Officer | जिल्हा शिक्षण अधिकारी |
| e) | District IB Officer (DCIO/AD) | IB कडून नियुक्त केलेला जिल्हास्तरीय अधिकारी. |
| f) | NIC Officer | जिल्हास्तरीय एनआयसी (NIC) अधिकारी |

राष्ट्रीय परिक्षा एजन्सी (NTA) यांचे मार्फत घेण्यात येणाऱ्या उक्त परिक्षांच्या जिल्हास्तरावरील नियोजनाकरिता उपरोक्त जिल्हास्तरीय समन्वय समितीस NTA ने नेमून दिलेली कार्ये व जबाबदाऱ्या खालीलप्रमाणे आहेत :-

१) जिल्हास्तरीय समितीने योग्य परीक्षा केंद्राची निवड करणे. सदर निवड करतांना मागील झालेल्या परीक्षांचा विचार करणे आवश्यक असून तसेच परीक्षा केंद्राचे मालकी हक्क असलेले लोकांचे पार्श्वभूमी तपासणे, तसेच याबाबतीत स्थानिक गुप्तचर विभागाचे अभिप्राय घेणे.
२) संशयित व्यक्तींची यादी तयार करून त्यांच्यावर देखरेख ठेवणे.

३) परीक्षा केंद्राची निवड करतांना सर्व पायाभूत सुविधांचा विचार करणे. तसेच, दिव्यांगासाठी वेगळया परीक्षां केंद्राची यादी बनविणे.

४) जिल्हास्तरीय समितीने प्रश्नपत्रिका Custodian यांच्याकडून ताब्यात घेण्यासाठी तसेच भरलेल्या OMR उत्तरपत्रिका परीक्षा केंद्रापासून Collection Center वर नेण्याकरीता जिल्हा पोलीस, निमलष्करी बल यांच्या संरक्षणासह वाहतुकीकरीता व्यूहरचना तयार करणे.

५) परीक्षेच्या एक दिवसापुर्वी परीक्षा केंद्राची स्वच्छता करून घेणे, जेणेकरून परीक्षा केंद्रावरील मनुष्यबळामार्फत गैरप्रकार टाळणे शक्य होईल.

६) परीक्षा केंद्र हे जिल्हा प्रशासन तथा पोलीस यांच्या देखरेखीखाली ताळेबंद (सील) करणे, तसेच जिल्हा प्रशासन व NTA अधिकारी यांच्यासमोर उघडले (डीसील) जाईल, याची खबरदारी घेणे.

७) जिल्हास्तरावर CCTV Monitoring केंद्राची स्थापना करणे. सदर केंद्र हे जिल्हास्तर NTA अधिकारी व जिल्हा प्रशासन यांच्या ताब्यात राहील. CCTV Monitoring केंद्राने सर्व CCTV Footage तपासून सर्व DVR हे परीक्षेच्या दिवशी सुरक्षिततरित्या NTA ला जमा करणे.

८) परीक्षे दरम्यान कायदा व सुव्यवस्था अबाधित राहील, यासाठी व्यूहरचना तयार करणे.

९) आपत्कालीन स्थितीत NTA Communication Cell यांच्याकडे पुढील सुचनांसाठी संपर्क साधणे.

१०) राष्ट्रीय परिक्षा एजन्सीव्दारे वेळोवेळी देण्यात येणाऱ्या सूचनांनुसार कार्यवाही करणे.

३. राज्यस्तरीय समन्वय समितीचे अध्यक्ष असलेले आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई तसेच, जिल्हास्तरीय समन्वय समितीचे अध्यक्ष असलेले संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी यांनी समितीमधील सर्व सदस्य व राष्ट्रीय परीक्षा एजन्सी यांचेशी समन्वय साधून समितीचे कामकाज तात्काळ सुरु करावे.

४. **"राज्यस्तरीय समन्वय समिती"** व **"जिल्हास्तरीय समन्वय समिती"** यांनी त्यांना उपरोक्त प्रमाणे नेमून देण्यात आलेली कार्ये व जबाबदाऱ्या परस्पर समन्वयाने पार पाडाव्यात.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०२२८११३४४७१००८ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SANTOSH PUNAMCHAND KHORGADE
Date: 2025.02.28 14:18:11 +05'30'

**(संतोष पु. खोरगडे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) अध्यक्ष, राज्यस्तरीय समन्वय समिती - आयुक्त, सामाईक प्रवेश परिक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य मुंबई.

२) सर्व सदस्य, राज्यस्तरीय समन्वय समिती (आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परिक्षा कक्ष यांचे मार्फत)

३) अध्यक्ष, जिल्हास्तरीय समन्वय समिती - संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी

४) सर्व सदस्य, जिल्हास्तरीय समन्वय समिती (संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी तथा जिल्हा दंडाधिकारी यांचे मार्फत)

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उप मुख्यमंत्री (अर्थ व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/ विधानसभा, विधानभवन, मुंबई
९) सर्व प्रशासनिक विभागाचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय्य सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२) संचालक, उच्च शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) संचालक, माहिती तंत्रज्ञान, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
१४) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे
१५) कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापीठ, लोणेरे, ता.माणगांव, जि.रायगड
१६) सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (सर्व), (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
१७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई (प्रसिध्दीसाठी)
१८) सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) निवडनस्ती/तांशि-४.